अतिरिक्त सरकारी वकील, सोलापूर यांचे मानधनाची रक्कम अदा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०३२२/प्र.क्र.८९/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : २८ मार्च, २०२३

वाचा : -

परिवहन आयुक्त,महाराष्ट्र राज्य मुंबई, यांचे पत्र क्र.पआका /अंमल -२ /सीतना आसं / प्र.क्र.४५-ब /सीतना नांदणी/२०२२/जा.क्र.३५७२ दि.२५.०३.२०२२, जा.क्र. ८०४६ दि.१४.०७.२०२२ , जा.क्र. २६५९ दि.२२.०२.२०२३

प्रस्तावना :-

सीमा तपासणी नाके आधुनिकीकरण व संगणकीकरणांतर्गत अतिरिक्त सरकारी वकील, श्री.ए.एम.गोरे यांनी सीमा तपासणी नाका,नांदणी जि.सोलापूर येथील भूसंपादनाच्या वाढीव नुकसान भरपाईबाबत एल.ए.आर. नंबर १२६,१२७,१२८,१२९ व १४८/२०१२,एस.आर.क्र.१/२००८ या प्रकरणामध्ये मा.दुसरे सह दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर कोल्हापूर येथे कामकाज पाहिले आहे. त्या दाव्याप्रकरणी संबधित मानधनाची रक्कम अदा करण्यास मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

सीमा तपासणी नाके आधुनिकीकरण व संगणकीकरणांतर्गत अतिरिक्त सरकारी वकील, श्री.ए.एम.गोरे यांनी सीमा तपासणी नाका,नांदणी जि.सोलापूर येथील भूसंपादनाच्या वाढीव नुकसान भरपाईबाबत एल.ए.आर. नंबर १२६,१२७,१२८,१२९ व १४८/२०१२,एस.आर.क्र.१/२००८ या प्रकरणामध्ये मा.दुसरे सह दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर कोल्हापूर येथे कामकाज पाहिले आहे. सदर दाव्याचा निकाल दि.३१.०८.२०१९ रोजी लागला असून श्री.गोरे यांच्या मानधनाची रु.८७,९२७/-(अक्षरी सत्त्याऐंशी हजार नऊशे सत्तावीस रुपय फक्त) इतके मानधन अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च हा " मागणी क्र.बी-३, मुख्य लेखाशिर्ष २०४१ वाहनावरील कर, (०२) प्रादेशिक कार्यालये, (०२) (०१) प्रादेशिक कार्यालये (२०४१ ००३६) (दत्तमत) (अनिवार्य), १३- कार्यालयीन खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

३. सदरहू शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग -पहिला, उप विभाग-दोन,अनुक्रमांक ४८ व महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १९६५, मधील नियम १६६ अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या पूर्ण अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२८१९१६०६४५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LANGHI
BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4, serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2023.03.28 19:20:13 +05'30'

**( भरत लांघी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
२. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. परिवहन उप आयुक्त (प्रशासन/लेखा) परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
४. उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, सोलापूर
५. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर
६. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
७. निवड नस्ती (परिवहन-४).